# मगर



**एवलिन शॉ**

**चित्र: फ्रांसिस ज़्वेइफ़ेल**

**मराठी: अश्विनी बर्वे**



# मगर

एवलिन शॉ

चित्र: फ्रांसिस ज़्वेइफ़ेल

मराठी: अश्विनी बर्वे



सकाळच्या धुक्यात दलदल लपते,
त्याच्यामुळे झाडं झुडूपं सुद्धा दिसत नाही
आणि आराम करणारे प्राणी सुद्धा त्यात
लपून जातात.



सकाळचा प्रकास वाढत जातो तसतसे
प्राणी हलायला सुरुवात करतात.

रैकून आणि अस्वल आपले पाय पसरतात. पक्षी आपले डोके वर करतात आणि चारी बाजूला बघतात.



एक मगर नाल्याजवळ
गवतावर बसली आहे.

मगर दहा फुट लांब आहे.
ती एवढी मोठी आहे की ती इतर
सर्व प्राण्यांपेक्षा सुरक्षित आहे.

मगर हालचाल करायला सुरुवात करते. ती एक मादी आहे, जवळपास एक महिना आधी तिने एका नरा बरोबर संभोग केला होता.



आता तिची अंडे देण्याची वेळ आली आहे.

तिला अंड्यासाठी एक मोठं घरटं तयार करावं लागेल. ती आपल्या घरटं बांधण्यासाठी अनेक दिवस काम करते. गवत सारखं करण्यासाठी ती त्यावर आपले पाय आपटते. ती आपल्या मोठ्या तोंडाने छोट्या झाडांच्या फांद्या आणि पानं तोडते. त्यांना ती एकसारखे पसरलेल्या गवतावर ओढते.



ती बांबू तोडते आणि तो आपल्या घरट्यात खेचत आणते. ती पाण्यात बुडी मारून जल वनस्पती उखडून आणते. रोपांना माती लागलेली असते. मगर ती रोपे आपल्या घरट्यात ठेवते.



घरटे उंच उंच होत जाते. तिथे झाडं, फांद्या, मातीचा एक छोटा ओला डोंगर तयार होतो. तो जवळपास दोन फुट उंच असतो. मगर तिथे चाळीस अंडी देते. ती अंड्यांना झाडाने आणि मातीने झाकून टाकते. मातीत आणि पालापाचोळयात अंडी झाकली गेली.





अंडी दिसत नाहीत, पण काही प्राणी त्यांना घरट्यातून खोदून काढतात. रेकून आणि अस्वले मगरीची अंडी खातात. एक अस्वल तर सगळी चाळीसच्या चाळीस अंडी खाऊ शकतो.

म्हणून मगर जास्त वेळ आपल्या घरट्याजवळच राहते.





पण कधीकधी तिला घरटे सोडून जावे लागते. तिला खाण्यासाठी मासे शोधावे लागतात. एक दिवस सकाळी मागर आपल्या घरापासून दूर गेली. ती अन्नाच्या शोधात होती.

एक रैकून घरट्याजवळ झाडांच्या मधून येतो. तो ही अन्नाच्या शोधात आहे.



रैकूनला मगरीची अंडी दिसतात. तो अंडी खाण्यासाठी खोदायला सुरुवात करतो.



अचानक,  मगर आपले मोठे डोकं पाण्याच्या बाहेर काढते. ती वास घेते आणि जोरजोरात फुत्कारायला लागते.





ती घरट्याकडे पळते. रेकून जितक्या वेगाने पळू शकतो तितक्या वेगाने पळतो.



उन्हाळा संपतो.
मगर दोन महिन्यापासून आपल्या
अंड्यांचे रक्षण करत होती.



ऑगस्टच्या शेवटी एका रात्री ती
घरट्याजवळ आराम करत होती.



अचानक, तिला एक विचित्र आवाज ऐकू येतो. दोन माणसं नाव चालवत येत होते.

ते शिकारी होते
जे मगरीच्या शोधात होते.
त्यांना मगरीला मारायचं होतं.
त्यांना तिची कातडी विकायची इच्छा होती.



मगर एकदम शांत बसून राहिली.
एक शिकारी तिच्यावर बंदूक चालवतो.
गोळी तिच्या पाठीवर वरच्या भागाला लागते.

पण तिला काही जखम होत नाही.
ती आपल्या छोट्या मोठ्या पायांना
शरीराच्या जवळ घेते. ती आपली
शक्तिशाली शेपूट हलवते. मग नाल्यात
बुडी घेते आणि पाण्याच्या आत गायब
होते.





नाल्यात खोलवर जाऊन ती परत वर येते. ती एवढी स्थिर राहू शकते की ती तरंगणाऱ्या लाकडासारखी दिसते. नंतर ती घरट्याकडे जाण्याचा प्रयत्न करते पण शिकारी अजून तिथेच आहेत.

तिला आपल्या घरट्यापासून दूर राहावे लागते आहे. घरट्याच्या आत तिची मुलं अंड्यातून बाहेर येऊ लागले आहेत. अधिकांश मुलं अंड्याचे कवच फोडून बाहेर येतात. पण ते घरट्यातून बाहेर येऊ शकत नाही.



ते त्या पाला पाचोळ्यातून बाहेर पडू शकत नाही. जर त्यांना लवकर बाहेर काढले नाही तर ते सर्व मरून जातील. अंड्याच्या बाहेर आल्यावर त्यांना हवा आणि अन्नाची गरज असते.

मगरीला आपल्या मुलांना बाहेर काढावं लागेल पण ती घरट्याजवळ जाऊ शकत नाही.

मग शिकारी अजून एका मगरीला पाण्याच्या बाहेर येतांना बघतो. ती मगर या आई मगरीपेक्षा मोठी आहे. ते शिकारी नावेने तिच्याजवळ जातात.





एक माणूस तिच्यावर गोळी चालवतो. पण ती गोळी त्या मगरीला लागत नाही. मगर जोरात त्या नावेच्या मागे धावते.



एक शिकारी नावेत पडतो.

दूसरा शिकारी नावेला जितक्या लवकर
दूर नेता येईल तेवढ्या दूर नेतो.



आता मगरीला आपल्या घरट्यात परत जाणे सुरक्षित वाटते. ती पाण्यातून बाहेर पडते आणि घरट्याच्या जवळ आराम करत पडून राहते.





ती घरट्यातून मुलांचा हळूवार आवाज ऐकते. ती घरट्याचा काही भाग स्वच्छ करते.



मगर आपल्या चाळीस बाळांना तिच्या घरट्यातून बाहेर काढते. ते सगळे आपल्या आईकडे बघतात. पण ते अजून केवळ नऊ इंच लांब आहेत.

मुलं आपल्या आईकडे धावतात. ती हळू आवाजात गुरगुर करते.

ते बरोबर राहतात.
काही दिवसांनी आई
अन्नाच्या शोधात
पाण्यात बुडी मारते.





ती बघते एक काळी वस्तू तिच्याकडे येत आहे. मगर खूप शांत होते. ती काळी वस्तू म्हणजे माशांची झुंड होती. त्या समुहात शेकडो मासे होते आणि ते तिच्या जवळ येत होते.

आपली मोठी शेपूट हलवत आई काही मासे किनाऱ्यावर फेकते. मग ती पाण्यातून बाहेर येते आणि मासे खायला सुरुवात करते. तिची मुलं माशांचे छोटे छोटे तुकडे खातात जे त्यांची आई तोंडातून काढून देते.



लवकरच मुलं त्यांचे अन्न
शोधायला बाहेर पडतात,
ते मोठे होत आहेत.



जेव्हा हिवाळा येतो.
तेव्हा मुलं आराम करतात.

ANDRUSS LIBRARY



वसंत ऋतु मध्ये
प्रत्येक तरुण मगरी राहण्यासाठी
जागा शोधतात.

जवळपास दहा वर्षात जर ते इतर प्राण्याच्या
शिकारीत मेल्या नाही तर त्या आपल्या आई
इतक्या मोठ्या होतील.

दक्षिणेकडच्या दलदलीत राहणाऱ्या अनेक प्राण्यांपैकी ते एक असतील.

समाप्त